**नागरिकांची सनद तयार करुन प्रसिध्द करण्याबाबत........**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : नासद १५१६/प्र.क्र ६६ /१८ अ**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- २८ डिसेंबर, २०१६

**वाचा:-** १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक नासद २००६/१०३/०६/१८ अ, दि. ३ नोव्हेंबर, २००६

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक नासद २००७/११५/०६/१८/०७/१८अ, दि. १३ ऑगस्ट, २००७

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक नासद २००९/४३२/प्र.क्र.८०/०९/१८ अ, दि.२३ जुलै, २००९

४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक नासद१००६/प्र.क्र.१०३/०६/१८ अ, दि. ३ ऑगस्ट, २००९

५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक नासद २००९/प्र.क्र.८०/०९/१८-अ, दि. ४ ऑगस्ट २००९

६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक नासद १००९/५९५/प्र.क्र.१०२/०९/१८-अ, दिनांक १२ जानेवारी, २०१०

७) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक नासद २०११/प्र.क्र.१७२/१८-अ, दिनांक ६ सप्टेंबर, २०११

८) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण २०१२/प्र.क्र.५४/१८(रवका), दिनांक ९ जुलै, २०१२

**शासन परिपत्रक :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दिनांक १ जुलै, २००६ पासून राज्यात लागू करण्यात आला असून या अधिनियमाच्या प्रकरण तीन मधील कलम ८ (१) नुसार प्रत्येक कार्यालयाने त्यांच्या कार्यालयामार्फत हा अधिनियम अंमलात आल्यापासून सहा महिन्याच्या आत नागरिकांची सनद प्रसिध्द करण्याची कार्यवाही करावयाची आहे. तर उक्त अधिनियमाच्या प्रकरण तीन मधील कलम ८(२) नुसार नागरिकांच्या सनदेमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कालावधीमध्ये संबंधित प्राधिकाऱ्यांकडून कोणताही अंतिम निर्णय घेण्यात आला नाही तर, आवश्यक ती कार्यवाही न केल्याबद्दल त्यांना जबाबदार धरले जाईल आणि संबंधित अधिनियम, नियम किंवा विनियम यामध्ये उल्लेखिलेली कारवाई त्यांच्यावर केली जाईल अशी तरतूद आहे.

२. प्रत्येक प्रशासकीय विभागाने नागरिकांची सनद प्रसिध्द करण्याच्या अनुषंगाने सर्व विभागांना वेळोवेळी संदर्भाधीन परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या आहेत. शासकीय कार्यालयांकरिता नागरिकांच्या सनदेचा पुढील नमुना संदर्भ क्र.(५) येथील शासन परिपत्रक दि. ४.८.२००९ अन्वये विहित करण्यात आलेला आहे.

| अ.क्र. | सेवांचा तपशील | सेवा पुरविणारे अधिकारी/कर्मचारी यांचे नाव व हुद्दा | सेवा पुरविण्याची विहित मुदत | सेवा मुदतीत न पुरविल्यास तक्रार करावयाच्या वरिष्ठ अधिकाऱ्याचे नाव व हुद्दा |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| | | | | |

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ प्रकरण एक मधील कलम २(क) नुसार "नागरिकांची सनद"याचा अर्थ, कार्यालयाने किंवा विभागाने दिलेल्या सुविधा किंवा सेवा यांची सूची तसेच अशा सुविधा किंवा सेवा सर्वसामान्य जनतेला पुरविण्याची असलेली कालमर्यादा असा आहे" त्यामुळे उपरोक्त तक्त्यात सेवा/सुविधांचा समावेश असणे अपेक्षित आहे.

३. तसेच संबंधित कार्यालयाने तयार केलेल्या नागरिकांच्या सनदेतील तरतूदीनुसार विहित मुदतीत सेवा पुरविण्यास जाणूनबजून वा हेतूपुरस्कर जे अधिकारी/कर्मचारी विलंब करतील त्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास सक्षम प्राधिकाऱ्याने महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम १० मधील तरतूदीनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरु करणे आवश्यक आहे. वरीलप्रमाणे सर्व सक्षम प्राधिकाऱ्यांनी कलम १० मधील तरतूदीनुसार कारवाई करावी अशा सूचना उपरोक्त दि.४.८.२००९ च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत.

४. नागरिकांची सनद अंतिम करण्यासाठी संदर्भ क्र.(६) येथील दि. १२ जानेवारी, २०१० च्या परिपत्रकान्वये समिती गठित करण्यात आली आहे. सदर समितीच्या अंतिम मान्यतेने नागरिकांची सनद प्रसिध्द करणे आवश्यक आहे. सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त कार्यालयांची नागरिकांची सनद एकत्रितपणे सादर केल्यास ही कार्यवाही करणे सुलभ होईल अशा सूचना संदर्भ क्र. (७) येथील दि. ६.९.२०११ च्या परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत.

५. नागरिकांच्या सनदेला व्यापक प्रसिध्दी देण्यासाठी कोणत्या उपाययोजना कराव्यात याबाबतच्या मार्गदर्शनपर सूचना अनुक्रमे अ.क्र.(२) येथील दि. १३ ऑगस्ट २००७ व अ.क्र.(७) येथील दि. ६ सप्टेंबर, २०११ च्या शासन परिपत्रकांन्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्याचप्रमाणे अ.क्र.(४) येथील दि. ३ ऑगस्ट २००९ च्या परिपत्रकान्वये नागरिकांची सनद "लोकराज्य" मासिकामध्ये प्रसिध्द करण्याच्या सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

६. बहुतेक मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी नागरिकांची सनद तयार केलेली असून काही विभाग तसेच त्यांच्या अधिनस्त कार्यालयांच्या नागरिकांची सनद शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. तथापि काही शासकीय कार्यालयांकडून अद्यापही नागरिकांच्या सनद तयार करण्याची अथवा कार्यालयात ठळकपणे प्रसिध्द करण्याची कार्यवाही केली जात नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. हया गंभीर बाबीची दखल घेऊन संदर्भ क्र. (८) येथील शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण २०१२/प्र.क्र.५४/१८(र.व का.) दि. ९ जुलै, २०१२ अन्वये सर्व मंत्रालयीन विभागाच्या सचिवांनी तसेच विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी स्वत: आढावा घेऊन प्रत्येक कार्यालयाची नागरिकांची सनद प्रसिध्द केली जाईल याची खात्री करावी व ज्या विभागांनी/कार्यालयांनी नागरिकांची सनद प्रसिध्द केली नाही अशा कार्यालयांची माहिती पुढील

नमुन्यात अ.मु.स.(प्र.सु.व र.व का.) यांचेकडे सादर करण्यात यावी अशा सूचना देण्यात आल्या आहेत.

| विभागाचे नाव | अधिनस्त कार्यालयांची संख्या | यापैकी किती कार्यालयांनी नागरिकांची सनद प्रसिध्द केली त्यांची संख्या | ज्या कार्यालयांनी नागरिकांची सनद प्रसिध्द केली नाही त्यांची संख्या | नागरिकांची सनद प्रसिध्द न करणाऱ्या अधिकारी/ कर्मचारी यांच्याविरुध्द केलेली शिस्तभंगाची कारवाई |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| | | | | |

७. शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार प्रत्येक प्रशासकीय विभागाने त्यांचे खुद्द व त्यांच्या अधिनस्त सर्व कार्यालयांनी नागरिकांची सनद तयार करुन ती प्रसिध्द करण्याची कार्यवाही उक्त २००५ च्या अधिनियमान्वये विहित केलेली कालमर्यादा केव्हाच संपून गेली असल्यामुळे या आदेशाच्या दिनांकापासून जास्तीत जास्त एका महिन्याच्या आत पूर्ण करावी तसेच नागरिकांची सनद शासनाच्या सर्व कार्यालयाच्या दर्शनी भागावर लावावी व शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावी असे पुन:श्च निर्देश देण्यात येत आहेत.

८. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी या परिपत्रकातील सूचना त्यांच्या अधिनस्त सर्व शासकीय कार्यालयांच्या निदर्शनास आणाव्यात व नागरिकांच्या सनदेबाबतच्या कार्यवाहीचे तंतोतत अनुपालन केले जाईल याची प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांनी व्यक्तिश: दक्षता घ्यावी. तसेच नागरिकांची सनद प्रसिध्द केली नाही अशा कार्यालयांची माहिती व अनुपालन न करणारे विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन त्याबाबतची विभागाची एकत्रित माहिती वरील परिच्छेद ६ मधील नमुन्यात अ.मु.स.(प्र.सु.व र.व का.) यांचेकडे उशिरात उशीरा दि. ३१ जानेवारी, २०१७ पर्यंत सादर करावी.

९. वरीलप्रमाणे केलेल्या कार्यवाहीचा आढावा मा.मुख्य सचिव घेणार आहेत याची नोंद घ्यावी.

१०. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१६१२३०१५५४५३०००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Muralidhar Sahai

Digitally signed by Bhagwan Muralidhar Sahai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=57dd6ec1681532b63c78bdc2d0f79ab4b9efccc6814de3df1f59d557777b3c45, cn=Bhagwan Muralidhar Sahai
Date: 2016.12.30 16:00:22 +05'30'

**( भगवान सहाय )**

**शासनाचे अपर मुख्य सचिव (प्र.सु.व र.व का.)**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती) पत्राने
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव (५ प्रती), मंत्रालय, मुंबई-३२
३) सर्व मा.मंत्री /मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२

४) मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा/विधान परिषद,विधानमंडळ, मंत्रालय, मुंबई-४०००३२
५) सर्व मा. संसद सदस्य/विधानसभा सदस्य/विधान परिषद
६) सचिव, राज्य निवडणूक आयोग (पत्राने), १३वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ४०० ०३२
७) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
८) मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मा.मुंबई उच्च न्यायालय
९) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१०) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
११) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई
१२) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर
१३) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२
१४) महाप्रबंधक, मा.मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
१५) प्रबंधक, मा.मुंबई उच्च न्यायालय,( मूळ शाखा ), मुंबई
१६) प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, १ला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ४०० ०३२
१७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने), बँक ऑफ इंडीया इमारत, मुंबई २३
१८) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१९) मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
२०) सर्व विभागीय आयुक्त
२१) सर्व जिल्हाधिकारी
२२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२३) सर्व महानगरपालिका आयुक्त ,
२४) सर्व पोलीस आयुक्त / सर्व पोलीस अधीक्षक,
२५) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ प्रादेशिक प्रमुख
२६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२८) कक्ष अधिकारी, कार्यासन अर्थ-१/व्यय-४/विसु.१, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
२९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई -३२,
३०) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई-३२
३१) निवड नस्ती (कार्यासन १८ अ), सा.प्र.वि.,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.